**मोटर अपघात दावा क्र.४५३/२००४, महाराष्ट्र शासन विरुध्द श्री. अशोक पाल -**

**शासकीय वाहन ट्रक क्र. एम.एच.०९ यु.८५१८, या वाहनाच्या अपघात प्रकरणी रु.२७,०४,५७९/- एवढी नुकसान भरपाईची रक्कम मा. मोटार अपघात दावा प्राधिकरण, ठाणे येथे अनामत रक्कम म्हणून जमा करण्यास मंजूरी देण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन निर्णय क्रमांकः जेएलएम- १११९/प्र.क्र.१४०/तुरुंग-२,**

दुसरा मजला, मुख्य इमारत, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २० फेब्रुवारी, २०२०.

**वाचा:**

१. अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक महाराष्ट्र राज्य, पुणे यांची पत्रे क्र.इप्रवि/कोमका/अपघात/नु.भरपाई/८१५८/२०१९/कक्ष-६ (२) पुणे,१, दिनांक ७.१०.२०१९ व क्र.इप्रवि/कोमका/अपघात/नु.भरपाई/४९९/२०२०/कक्ष-६ (२) पुणे,१, दिनांक १३.१.२०२०.

२. मोटार अपघात दावा प्राधिकरण, ठाणे यांचा दावा क्र.४५३/२००४ प्रकरणी दिनांक ३०.३.२०१६ चे आदेश,

३. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे सिविल अेप्लीकेशन क्र.२९/२०१८, पहिले अपिल क्र.३३५३१/ २०१७ मधील एम.ए.सी.टी. क्र.४५३/२००४ प्रकरणी दिनांक ५.८.२०१९ चे आदेश.

**प्रस्तावना:**

कोल्हापूर मध्यवर्ती कारागृहाचे नावे असलेले शासकीय वाहन क्र. एम.एच.०९ यु.८५१८ या वाहनाचा दिनांक १७.४.२००४ रोजी अपघात झाला होता. सदर वाहन २००३ मध्ये ठाणे मध्यवर्ती कारागृहाकडे वर्ग करण्यात आले होते. सदर शासकीय वाहन, ठाणे मध्यवर्ती कारागृहाच्या ताब्यात असताना त्यांचे आस्थापनेवरील श्री. टी.जी.बांदल, वाहन चालक, हे वाहन चालवत असताना दिनांक १७.४.२००४ रोजी खोपट नाका, ठाणे येथे सदर वाहनाचा अपघात झाला. सदर अपघाताबाबत श्री. अशोक पाल यांनी मोटर वाहन अपघात दावा क्र. ४५३/२००४ अन्वये नुकसान भरपाई रक्कम मिळणेबाबत मा. जिल्हा न्यायाधीश क्र.४, ठाणे येथे दावा दाखल केला होता. सदर दाव्याचा निकाल श्री.अशोक पाल यांच्या बाजुने लागल्याने संबंधितांना नुकसान भरपाई रक्कम रु.१२,९७,१६०/- +७ % (दिनांक २.७.२००४ पासून) व्याज देण्याबाबत मा. मोटार अपघात दावा प्राधिकरण, ठाणे यांनी वाचा क्र.२ अन्वये आदेश परित केले.

२. उक्त आदेशा विरुध्द मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे सिविल अेप्लीकेशन क्र.२९/२०१८, पहिले अपिल क्र.३३५३१/२०१७ मधील एम.ऐ.सी.पी. क्र.४५३/२००४ अन्वये पहिले अपिल दाखल केले असता मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी मूळ रक्कम रु.१२,९७,१६०/- व त्यावरील ७ % (दिनांक

२.७.२००४ पासून) व्याजाची रक्कम अनामत रक्कम म्हणून District Judge-४ Member MACT, Thane येथे जमा करण्याबाबत वाचा क्र.३ अन्वये आदेश परित केले. सदर आदेशाच्या अनुषंगाने अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वाचा क्र.१ अन्वये **रु.२७,०४,५७९/- (अक्षरी रुपये सत्ताविस लक्ष चार हजार पाचशे एकोणऐंशी)** इतकी रक्कम अनामत रक्कम म्हणून जमा करण्याबाबत मंजुरी मिळण्याबाबत व सदर निधी उपलब्ध करुन देण्याबाबत शासनास प्रस्ताव सादर केला. त्यानुषंगाने रु.**२७,०४,५७९/- (अक्षरी रुपये सत्ताविस लक्ष चार हजार पाचशे एकोणऐंशी)** इतकी नुकसान भरपाईची रक्कम, मोटर वाहन अपघात दावा क्र. ४५३/२००४ अन्वये District Judge-४ Member MACT, Thane येथे अनामत रक्कम म्हणून जमा करण्याकरिता मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी आदेशित केल्यानुसार मूळ रक्कम रु.१२,९७,१६०/- व त्यावरील ७ % (दिनांक २.७.२००४ पासून) व्याजाची रक्कम रु.१४,०७,४१८.६० अशी मिळून **एकूण रु.२७,०४,५७९/- (अक्षरी रुपये सत्ताविस लक्ष चार हजार पाचशे एकोणऐंशी)** इतकी नुकसान भरपाईची रक्कम, मोटर वाहन अपघात दावा क्र. ४५३/२००४ अन्वये District Judge-४ Member MACT, Thane येथे शासकीय वाहन क्र. एम.एच.०९ यु.८५१८ च्या अपघाताच्या अनुषंगाने अनामत रक्कम म्हणून जमा करण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. सदर खर्च मागणी क्र. बी-५ मुख्यलेखाशिर्ष २०५६ तुरुंग, १०१, तुरुंग (००) (००) (०१) मध्यवर्ती तुरुंग (२०५६००३५) (दत्तमत) (अनिवार्य) (५०) इतर खर्च, या लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार वित्तिय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला उपविभाग चार मधील अनुक्रमांक पाच मधील अटींच्या अधीन राहून प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२२०१४४०५०७८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Narayan Shrikrishna Karad

Digitally signed by Narayan Shrikrishna Karad
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9a5ba422569807a70f83ba75f7e5057f99ed671bf7ac8f8fb14e28b9d6f90514, cn=Narayan Shrikrishna Karad
Date: 2020.02.20 16:23:47 +05'30'

**(ना.श्री. कराड)**
**उप सचिव, गृह विभाग**

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक (कारागृह), महाराष्ट्र राज्य,
२. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,

३. विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह), दक्षिण विभाग, भायखळा, मुंबई,
४. कारागृह उपमहानिरीक्षक, पश्चिम विभाग, पुणे,
५. कारागृह उपमहानिरीक्षक, पूर्व विभाग, नागपूर
६. कारागृह उपमहानिरीक्षक, मध्य विभाग, औरंगाबाद
७. अधिक्षक, ठाणे मध्यवर्ती कारागृह, ठाणे,
८. महालेखापाल लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई,
९. महालेखापाल लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर,
१०. कार्यासन अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.कार्यासन अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२.जिल्हा कोषागार कार्यालय, ठाणे,
१३.निवड नस्ती/तुरुंग-२.

*********//***********